**शासकीय सेवेत अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

शासन निर्णय क्रमांक अकंपा. १०००/प्र. क्र. २०/२०००/आठ

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २८ मार्च २००१.

**वाचा** .—(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अकंपा. १०९३/२३३५/प्र. क्र. ९०/९३/आठ, दिनांक २६ ऑक्टोबर १९९४.

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अकंपा. १०९५/प्र. क्र. ३४-अ/आठ, दिनांक २३ ऑगस्ट १९९६.

(३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक अकंपा. १०९३/२३३५/प्र. क्र. ९०/९३/आठ, दिनांक १२ मार्च १९९७.

(४) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्रमांक बीसीसी. १०८६/५४४/सीआार-६३/८६/न. वि. १०, दिनांक ६ मे १९८६.

(५) शासन परिपत्रक, नगर विकास विभाग, क्रमांक : संकीर्ण. २९९२/१९९९/प्र. क्र. १६४/९२/न. वि. ६, दिनांक ५ नोव्हेंबर १९९२.

**शासन निर्णय**

शासन सेवेत असताना दिवंगत/अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचाऱ्यांच्या नातेवाईकांस अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्यासंबंधीच्या योजनेचे सुधारित नियम संदर्भाधीन क्रमांक (१) येथील दिनांक २६ ऑक्टोबर १९९४ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले आहेत. त्यात संदर्भाधीन क्रमांक (२) व (३), येथील दिनांक २३ ऑगस्ट १९९६ आणि दिनांक १२ मार्च १९९७ च्या शासन निर्णयान्वये केलेल्या सुधारणांचा पुर्नविचार करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते. याबाबत विचार करून आता शासन खालीलप्रमाणे निदेश देत आहे :--

(अ) संदर्भाधीन क्रमांक (३) येथील दिनांक १२ मार्च १९९७ च्या शासन निर्णयानुसार विहित केलेली राज्यात जिल्हाधिकाऱ्यांनी आणि मुंबईत सामान्य प्रशासन विभागात एकत्रित प्रतिक्षासूची ठेवण्याची प्रचलित कार्यपद्धती यापुढे देखील तशीच चालू ठेवण्यात येत आहे.

(ब) संदर्भाधीन दिनांक २६ ऑक्टोबर १९९४ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (ब), (क), (ड) रद्द करून त्याऐवजी खालीलप्रमाणे सुधारित तरतूद २ (ब) येथे समाविष्ट करण्यात येत आहे :—

" वयाची ५० वर्षे पूर्ण होण्यापूर्वीच जे कर्मचारी कर्करोग, पक्षाघात किंवा अपघातामुळे सेवेसाठी कायमचे असमर्थ होतील केवळ त्याच्याच कुटुंबियांना अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र समजण्यात यावे."

या सुधारित तरतुदीच्या समावेशामुळे संदर्भाधीन क्रमांक (२) येथील दिनांक २३ ऑगस्ट १९९६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद २ (अ) येथील तरतूद वगळण्यात आल्याचे समजण्यात यावे.

(क) गट " क " व " ड " मधील जी रिक्त पदे भरण्यास शासनाने मंजुरी दिली आहे केवळ अशाच पदांवर अनुकंपा तत्त्वावर नियुक्त्या करण्यात याव्यात.

(ड) अनुकंपा तत्त्वावरील गट " क " व " ड " मधील पदांवर करण्यात येणाऱ्या नियुक्त्या यापुढे शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय करण्यात येऊ नयेत.

(इ) दिनांक ३१ डिसेंबर २००१ नंतर तिसरे अपत्य झालेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांस अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीसाठी पात्र समजले जाणार नाही.

(फ) अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीचा लाभ, सेवेत असताना दिवंगत किंवा वरील (ब) प्रमाणे अकाली निवृत्त केवळ गट " क " व " ड " मधील कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना गट " क " व " ड " मधील पदावर नियुक्तीसाठी अनुज्ञेय राहील.

२. अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीसंबंधातील वरील सुधारित तरतुदी सदर आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

३. सर्व जिल्हाधिकाऱ्यांनी तसेच सर्व नियुक्ती अधिकाऱ्यांनी त्यांचेकडील अनुकंपा नियुक्तीसंबंधीची प्रकरणे हाताळताना उपरोक्त सुधारित निदेशांचे काटेकोरपणे पालन होत आहे याची खात्री करावी.

४. शासन असेही आदेश देत आहे की, संदर्भाधीन क्रमांक (४) व (५) येथील नगरविकास विभागाच्या अनुक्रमे दिनांक ६ मे १९८६ आणि दिनांक ५ नोव्हेंबर १९९२ च्या शासन परिपत्रकातील तरतुदीनुसार नगरपालिका/महानगरपालिकांमध्ये सफाई कर्मचाऱ्यांना लाड समितीच्या शिफारशीनुसार नियुक्त्या देण्याची सध्याची पद्धत यापुढेही चालू ठेवण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**प्रकाश लोखंडे,**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

(शा.म.मु.) एच २५ (१५,०००—४-२००१)

प्रति

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई (पत्राने),
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (१० जादा प्रतींसह) (पत्राने),
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई (पत्राने),
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व हक्कदारी), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परीक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व हक्कदारी), नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व परीक्षा), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२, १३, १३-अ, १४-अ, १९, २८, २८-अ, ३४, ३४-अ, ३७,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरून),
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
निवड नस्ती कार्यासन आठ.

---

* पत्राने.